श्रीमती प्रभावती भास्करराव शिंगणे बहुउद्देशिय संस्था, देऊळगाव मही, जि.बुलढाणा संचालित स्व. भास्करराव शिंगणे माध्यमिक विद्यालय, टाकरखेड भागीले, जि.बुलढाणा या शाळेचे मौजे निमगांव गुरू (रोहणा शिवार), जि.बुलढाणा येथे स्थलांतर करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
शालेय शिक्षण व क्रीडा विभाग
शासन निर्णय क्रमांकः माशास्थ ३३२२/प्र.क्र.४३८/२२/एसएम-१
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २५ एप्रिल, २०२३

वाचा :

शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्रमांक : माशास्थ ३३२१/प्र.क्र.४०१/एसएम-१ दिनांक २८ जुलै, २०२१.

संदर्भ :

विभागीय शिक्षण उपसंचालक, अमरावती विभाग, अमरावती यांचे जा.क्र. शिउसु/ माध्य/अ/ ३१२८/२२, दिनांक २७.०४.२०२२

प्रस्तावना :-

श्रीमती प्रभावती भास्करराव शिंगणे बहुउद्देशिय संस्था, देऊळगाव मही, ता.देऊळगाव राजा, जि.बुलढाणा संचालित स्व. भास्करराव शिंगणे माध्यमिक विद्यालय, टाकरखेड भागीले, ता.देऊळगाव राजा, जि.बुलढाण या मराठी माध्यमाच्या अनुदानित माध्यमिक शाळेचे (इयत्ता ८ वी ते १० वी), मौजे निमगांव गुरू (रोहणा शिवार), ता. देऊळगाव राजा, बुलढाणा येथे स्थलांतरास मान्यता देण्याचा संदर्भाधीन पत्रान्वये प्राप्त झालेला प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

शासन निर्णय :-

उपरोक्त शाळेचे भाड्याच्या इमारतीतून संस्था सदस्यांच्या जागेत जाण्यासाठी, मौजे निमगांव गुरू (रोहणा शिवार), ता. देऊळगाव राजा, जि.बुलढाणा येथे प्रस्तावित केले आहे. त्यामुळे सदर शाळेचे उपरोक्त ठिकाणी स्थलांतर करण्यास खालील अटी व शर्तीवर मान्यता देण्यात येत आहे.:-

(१) स्थलांतरीत शाळेची किमान पटसंख्येची अट कोणत्याही कारणास्तव शिथिल केली जाणार नाही. तसेच सर्व विद्यार्थ्यांना स्थलांतराच्या ठिकाणी सामावून घेणे आवश्यक राहील

(२) सदर शाळा मुळ ठिकाणी अनुदानाच्या ज्या तत्वावर कार्यरत होती, त्याच तत्वावर स्थलांतरीत ठिकाणी कार्यरत राहील.

(३) शासनाकडून शाळा, शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी, वेतन/वेतनेतर अनुदान, विद्यार्थी इ.संदर्भात वेळोवेळी विहित करण्यात येणारे अधिनियम, नियम, आदेश इ.चे पालन संस्थेने करणे आवश्यक राहील.

(४) शाळेच्या बाबतीत मुळ शासन परवानगीच्या व मान्यतेच्या कोणत्याही अटी व शर्तींमध्ये बदल होणार नाहीत.

(५) सदर स्थलांतरासंदर्भात शासनाकडे अथवा शिक्षण विभागाच्या क्षेत्रिय अधिकाऱ्यांकडे कोणत्याही प्रकारच्या तक्रारी वा आक्षेप आल्यास किंवा स्थलांतरासंदर्भातील अटींचा भंग झाल्याचे निदर्शनास आल्यास स्थलांतर रद्द करण्याचे अधिकार शासनास राहतील.

२. विभागीय शिक्षण उपसंचालक, अमरावती विभाग, अमरावती यांनी सदर शाळेच्या स्थलांतराबाबत पुढील कार्यवाही १५ दिवसांत करावी व केलेल्या कार्यवाहीबाबत शासनास अवगत करावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०४२५१६४६२५२७२१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRAVIN RAJARAM MUNDHE

Digitally signed by PRAVIN RAJARAM MUNDHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=8cc298cb2ba38f035e6bd1a51789c7ed1ed4f4fce865eda3495969f77d97c89a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=DC78036626EC580D66C0AC502D43AF5F670B5BA13F51213AD071ACD53714A284, cn=PRAVIN RAJARAM MUNDHE
Date: 2023.04.25 16:51:41 +05'30'

**( प्रविण मुंढे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. शिक्षण संचालक (माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
२. विभागीय शिक्षण उपसंचालक, अमरावती विभाग, अमरावती.
३. शिक्षणाधिकारी (माध्यमिक), जिल्हा परिषद, बुलढाणा.
४. अध्यक्ष/ सचिव, श्रीमती प्रभावती भास्करराव शिंगणे बहुउद्देशिय संस्था, देऊळगाव मही, जि.बुलढाणा.
५. निवडनस्ती (एसएम-१).